**प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत शाळांमध्ये परसबाग उपक्रमास प्रोत्साहन देण्याकरीता स्पर्धा आयोजित करण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०१८/प्र.क्र.१७१/एस.डी.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २१ जून, २०२४

**वाचा:-**

१) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना दि.१५ ऑक्टोंबर, २०१९.
२) प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेबाबत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना दि.२१ डिसेंबर, २०२२.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. शापोआ-२०१८/प्र.क्र.१७१/एस.डी.३, दि.११ जुलै, २०२३
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. शापोआ-२०१८/प्र.क्र.१७१/एस.डी.३, दि.०५ सप्टेंबर, २०२३

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत शाळांमध्ये परसबागा निर्माण करुन सदर परसबागांमधून उत्पादित भाजीपाला व इतर पदार्थांचा समावेश शालेय पोषण आहारामध्ये करण्याचे निर्देश दि. १५ ऑक्टोबर, २०१९ रोजीच्या मार्गदर्शक सूचनांनुसार दिले आहेत. त्यानुषंगाने विद्यार्थ्यांनी परसबागेत पिकवलेला भाजीपाला, फळे इत्यादींचा समावेश शालेय पोषण आहारात करुन विद्यार्थ्यांना योजनेचा लाभ देण्यात येत आहे. परसबाग निर्मितीमुळे विद्यार्थ्यांची निसर्गाशी जवळीक निर्माण होवून त्यांना नवनिर्मितीचा आनंद मिळणे, ताज्या भाजीपाल्याचा समावेश पोषण आहारात होवून विद्यार्थ्यांना पौष्टिक आहार उपलब्ध होणे असे विविध चांगले हेतू या उपक्रमामुळे साध्य होत आहेत. प्रस्तुत योजनेंतर्गत परसबाग उपक्रम प्रभावीपणे राबविण्यासाठी सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्षापासून शासनाने उत्कृष्ठ परसबाग स्पर्धा आयोजित केली होती. त्याचा परिणाम म्हणून राज्यामधील सुमारे २४,७४१ शाळांमध्ये परसबाग निर्माण झालेल्या आहेत. शैक्षणिक वर्ष २०२४-२५ मध्ये राज्यातील सर्व शाळांमध्ये परसबागा निर्माण करण्याचे उद्दिष्ट शासनाने निर्धारित करण्यात आले आहे. त्यानुषंगाने राज्यामध्ये प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत सन २०२४-२५ या शैक्षणिक पसरबाग उपक्रमास प्रोत्साहन देण्याकरीता परसबाग स्पर्धांचे आयोजन करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत राज्यातील सर्व पात्र शाळांमध्ये परसबागा निर्माण करण्यास प्रोत्साहन मिळण्यासाठी खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहेत.

i. राज्यातील सर्व शाळांमध्ये परसबागा निर्माण करुन सदर परसबागांमधून उत्पादित ताजा भाजीपाला यांचा वापर शालेय पोषण आहारामध्ये करण्यात यावा.

ii. प्रस्तुत उपक्रमाकरीता शाळांनी नजिकचे कृषि विज्ञान केंद्र, कृषि शाळा, कृषि विभागातील कृषि सहायक/ पर्यवेक्षक, कृषि क्षेत्रात काम करणाऱ्या अशासकीय संस्था (NGO), सेंद्रिय शेती करणारे पालक, शेतकरी, कृषि तज्ज्ञ यांचे मार्गदर्शन व सहकार्य घेण्यात यावे.

iii. राज्यात उत्कष्ट परसबागा तयार होण्यासाठी सदर परसबाग उपक्रमास प्रोत्साहन देणे आवश्यक आहे. याकरीता उत्कृष्ट परसबाग स्पर्धांचे तालुका व जिल्हास्तरावर आयोजन करण्यात यावे. त्यादृष्टीने उत्कृष्ट परसबाग स्पर्धेकरीता खालीलप्रमाणे बक्षिसांची रक्कम निश्चित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | स्तर | बक्षीसांची रक्कम रुपयात | | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम क्रमांक | व्दितीय क्रमांक | तृतीय क्रमांक | प्रोत्साहनपर (प्रत्येकी ३ शाळा) | |
| १ | तालुका | रु.७,५००/- | रु.५,०००/- | रु.३,०००/- | रु.२,०००/- | रु.२१,५००/- |
| २. | जिल्हा | रु.१५,०००/- | रु.११,०००/- | रु.७,५००/- | - | रु.३३,५००/- |

iv. प्रस्तुत परसबाग स्पर्धेचे मुल्यांकन करण्यासाठी शिक्षण, कृषी, आरोग्य, विभागातील अधिकारी तसेच, आहारतज्ज्ञ व स्थानिक प्रगतीशील शेतकरी यांची समिती गठीत करण्यात यावी. तसेच, उत्कृष्ट परसबागांचे मुल्यांकन पुढील निकषांच्या आधारे करण्यात यावे.

| अ.क्र. | बाब | गुण |
|---|---|---|
| १. | परसबागेची रचना / आराखडा | एकूण -१० |
| २. | हवामान परिस्थितीनुसार भाज्यांची लागवड | एकूण -२० |
| २.१ | भाज्यांची विविधता / देशी वाणांचा वापर | १० |
| २.२ | मायक्रोग्रीन पध्दतीचा वापर | ५ |
| २.३ | कमी पाणी लागणाऱ्या भाज्यांचा समावेश | ५ |
| ३ | परसबागेची व्यवस्थापन | एकूण - २५ |

| | | |
|---|---|---|
| ३.१ | सेंद्रिय परसबाग | ५ |
| ३.२ | सेंद्रिय खत निर्मिती | ५ |
| ३.३ | सिंचन पध्दत (पाण्याचा पुनर्वापर) | ५ |
| ३.४ | शाळेमधील टाकाऊ पदार्थांचा उपयोग | ५ |
| ३.५ | परसबाग व्यवस्थापन | ५ |
| ४ | विद्यार्थी, पालक व शिक्षकांचा सहभाग | एकूण -२० |
| ४.१ | विद्यार्थ्यांना परसबागेतील भाज्यांचा पोषण तत्त्वांची माहिती | १० |
| ४.२ | परसबाग तयार करणे व देखरेखीमध्ये विद्यार्थ्यांचा सहभाग | ५ |
| ४.३ | लोकसहभाग | ५ |
| ५ | उत्पादित भाजीपाल्यांचा आहारामधील समावेश | एकूण -१० |
| ५.१ | आठवड्यातून पोषण आहारामध्ये तीन दिवसांपेक्षा जास्त वेळा भाजीपाल्यांचा समावेश | १० |
| ५.२ | आठवड्यातून पोषण आहारामध्ये तीन दिवसांपेक्षा कमी वेळा भाजीपाल्यांचा समावेश | ५ |
| ६ | परसबागेतील भाज्यांची विक्री | एकूण - ५ |
| ७ | सामाजिक संस्था (NGO) यांचे परसबाग उभारणीमधील योगदान | एकूण -५ |
| ८ | शाळेमध्ये ECO-Club ची स्थापना व त्यातंर्गत राबवलेले उपक्रम. | एकूण -५ |
| | **एकूण गुण** | **१००** |

v. प्रस्तुत उपक्रमाकरीता येणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता केंद्र शासनाने योजनेंतर्गत व्यवस्थापन, संनियंत्रण व मुल्यमापन (MME) या घटकासाठी मंजूर केलेल्या निधीमधून अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

vi. तालुका स्तरावरील स्पर्धेचे मूल्यांकन करुन माहे ऑक्टोंबर,२०२४ अखेर तालुका स्तरीय विजेत्या शाळांची नावे संबंधित गटशिक्षणाधिकारी/अधिक्षक (शापोआ) यांनी घोषित करावीत. तसेच, तालुका स्तरावरील प्रथम क्रमांक विजेत्या शाळेतील परसबागेची तपासणी करुन जिल्हास्तरीय स्पर्धेचा अंतिम निकाल डिसेंबर, २०२४ अखेर जाहीर करण्याची जबाबदारी संबंधित जिल्ह्यांचे शिक्षणाधिकारी (प्राथ.) यांची राहील.

vii. सदर स्पर्धा विहित कालमर्यादेत पूर्ण होण्यासाठी क्षेत्रिय स्तरावर आवश्यक त्या सविस्तर सूचना देण्याची कार्यवाही शिक्षण संचालक (प्राथ.) महाराष्ट्र, राज्य, पुणे यांनी करावी.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२४०६२११७३९२३९७२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.06.21 17:52:46 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
१०) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१६) शिक्षणाधिकारी (बृहन्मुंबई), बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१७) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१८) निवड नस्ती - एस.डी. ३